**पाटबंधारे प्रकल्पांच्या कामांची प्राक्कलने/सुधारित प्रशासकीय मान्यतेची प्राक्कलने तयार करताना विचारात घ्यावयाच्या बाबी**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१०/(५७०/२०१०)मोप्र-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २० ऑक्टोबर, २०१०

**वाचा:- १)** शासन परिपत्रक, पाटबंधारे विभाग, क्रमांक संकीर्ण १०९८/(९६/९८)/मो.प्र(प्र), दि.४.९.२०००
२) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक संकीर्ण २००९/(४६५/२००९)मोप्र-२, दि.१५.१.२०१०

पाटबंधारे प्रकल्पांच्या कामांची प्राक्कलने/सुधारित प्रशासकीय मान्यतेची प्राक्कलने तयार करताना वहन अंतर, अन्वेषण, संकल्पचित्रातील बदल, व्याप्तीतील बदल व इतर बाबी याबाबत कशी कार्यवाही करावी यांच्या सूचना महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम संहिता (१९८४) मधील परिच्छेद क्रमांक १४२ मध्ये कामांची अंदाजपत्रके तयार करताना विचारात घ्यावयाच्या बाबी विहित करण्यात आल्या आहेत. तसेच या विभागाचे शासन परिपत्रक, क्रमांक संकीर्ण १०९८/(९६/९८)/मो.प्र(प्र), दि.४.९. २००० व संकीर्ण २००९/(४६५/२००९)मोप्र-२, दि. १५.१.२०१० अन्वये देण्यात आल्या आहेत. प्रकल्पाच्या कामासाठी लागणाऱ्या साहित्याचे वहन अंतर कमी करण्याकरीता पुढील नमुद सूचना विचारात घेऊन त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

(अ) महामंडळाअंतर्गत विविध प्रकल्पाची कामे प्रगतीत व प्रस्तावित आहेत. प्रगतीत असलेल्या प्रकल्पाच्या उर्वरित कामासाठी व प्रस्तावित कामासाठी लागणाऱ्या बांधकाम साहित्याचा(माती, मुरूम, दगड, खडी, वाळू इत्यादी) आढावा घेण्यात यावा. हे साहित्य प्रत्यक्ष कामाच्या जागेपासून प्रस्तावित वहन अंतरापेक्षा कमी अंतरावर उपलब्ध आहे किंवा कसे याची सर्वेक्षणाव्दारे महामडळस्तरावर खातरजमा करावी.

(ब) कामासाठी लागणाऱ्या साहित्याचे वहन अंतर कमी करण्याकरीता प्रकल्पाच्या विविध घटकासाठी (Components) उदा. धरण, कालवे, वितरीका इत्यादीसाठी जवळच्या अंतरावर नवीन खाणीची निर्मिती करण्याचा पर्याय योग्य ठरेल काय हे तपासावे. नवीन खाणीची निर्मिती करताना प्रकल्पासाठी आवश्यक असलेले साहित्य खाणीतून उपलब्ध होणारे साहित्य व खाण निर्मितीसाठी येणारा खर्च या सर्वांचा विचार करून सदर खाण निर्मिती आर्थिक दृष्टया किफायतशीर आहे काय या बाबी तपासणे आवश्यक आहे, जेणेकरून प्रकल्पाला लागणाऱ्या

विविध बाबींचा (Items) दर वाजवी ठरुन प्रकल्पाच्या विविध घटकांचे, (Components) उदा. धरण कालवे वितरीकाच्या किंमती कमी होऊन एकूणच प्रकल्प कमी किंमतीत होईल. उपरोक्त सर्व बाबी विचारात घेऊन आर्थिकदृष्टया किफायतशीर असल्यास नविन खाणीची शक्य असेल तेथे निर्मिती बाबत कार्यवाही करावी.

२. उपरोक्त प्रकरणी उपविभागीय अभियंता, कार्यकारी अभियंता यांनी कार्यवाही करावी व अंदाजपत्रके सादर/मंजूर करण्यापूर्वी उपरोक्त कार्यवाही झाल्याची खातरजमा करुन दक्षता घ्यावी. सदर कार्यवाहीच्या अंमलबजावणीचा अधीक्षक अभियंता व मुख्य अभियंता यांनी आढावा घ्यावा तसेच कार्यकारी संचालक यांनी प्रशासकीय मान्यता/ सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव सादर करताना उपरोक्त सूचनेनुसार कार्यवाही झाल्याचे खात्री करुन प्रस्ताव शासनास सादर करावेत.

३. चुकीच्या अन्वेषणावरुन तयार केलेली अंदाजपत्रके व त्यावरुन करण्यात येणारी कामे तपासणीमध्ये निदर्शनास आल्यास त्या संदर्भात संबंधित कर्मचारी / अधिकारी यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येवून त्यांच्यावर शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल याची क्षेत्रीय कर्मचारी / अधिकारी यांनी नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१०१०२०२०३७०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(कि. सु. वाघ)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व तांत्रिक अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई